**नेरुळ येथिल फ्लेमिंगो पक्ष्यांचा नैसर्गिक अधिवास आणि कांदळवनांचे संरक्षण करण्याकरीता समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- विसता ०६.२४/प्र.क्र. ११/फ-१**

मंत्रालय, मुंबई.

दिनांक :- ०५.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

नवी मुंबई मधील नेरुळ सीवूड्स येथील डीपीएस तलावाजवळ फ्लेमिंगो पक्ष्यांचा मृत्यु झाल्याची घटना विचारात घेता तसेच सदर क्षेत्रामध्ये आढळून येणारे फ्लेमिंगो पक्ष्यांचे वास्तव्य पाहता त्यांचा नैसर्गिक अधिवास सुरक्षित करणे तसेच आसपासच्या परिसरातील कांदळवनांचे संरक्षण करण्यासाठी उपाययोजना करणे आवश्यक आहे. या अनुषंगाने सदर क्षेत्रात करावयाच्या उपाययोजनांबाबत अभ्यास करण्याकरीता समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

नेरुळ येथिल फ्लेमिंगो पक्ष्यांचा नैसर्गिक अधिवास आणि कांदळवनांचे संरक्षण करण्याच्या अनुषंगाने उपाययोजना सुचविण्यासाठी संबंधित विभागाचे अधिकारी व अशासकीय सदस्य यांचा समावेश करुन खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (वने) | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (पर्यावरण), पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव (नगर विकास-१) नगर विकास विभाग | सदस्य |
| ४ | व्यवस्थापकीय संचालक, सिडको | सदस्य |
| ५ | आयुक्त, नवी मुंबई महानगर पालिका | सदस्य |
| ६ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मॅरीटाईम बोर्ड | सदस्य |
| ७ | जिल्हाधिकारी, ठाणे | सदस्य |
| ८ | श्री. प्रविण परदेशी, अध्यक्ष, बी.एन.एच.एस. | सदस्य |
| ९ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष) | सदस्य सचिव |

**कार्यकक्षा:**

१) डीपीएस तलाव येथिल फ्लेमिंगो पक्ष्यांचा नैसर्गिक अधिवास सुरक्षित करण्याकरीता व्यवस्थापन आराखडा तयार करुन घेणे व त्यातील उपाययोजनांची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने शिफारस करणे.

२) डीपीएस तलावाच्या आसपासच्या परिसरातील कांदळवन क्षेत्राचे संवर्धन करण्याकरीता शिफारस करणे.

३) मुंबई व ठाणे क्षेत्रातील कांदळवनाच्या क्षेत्रावर होणाऱ्या अतिक्रमणाचा अभ्यास करुन कांदळवन संरक्षणासंबंधी शिफारस करणे.

सदर समिती दोन महिन्यांच्या आत आपला अहवाल शासनास सादर करेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७०९१११००६४११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.07.09 11:39:57 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत**:-

१) सर्व सन्माननीय विधान परिषद सदस्य / विधान सभा सदस्य
२) मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सर्व विभागांचे अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव मंत्रालय, मुंबई
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई.
७) जिल्हाधिकारी, ठाणे
८) श्री. प्रविण परदेशी, अध्यक्ष, बी.एन.एच.एस.
९) निवडनस्ती, फ-१ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई.